राष्ट्रीय सेवा योजना
**सन २०१५-१६ (अन्य वर्गासाठी समायोजित हप्ता) व सन २०१६-१७ ( सर्व प्रवर्गांसाठी प्रथम हप्ता समायोजनासह ८१ % ) सहाय्यक अनुदान , केंद्र हिस्सा (सशर्त) उर्वरित ३ विद्यापीठांना निधी वितरण करणे.**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांकः रासेयो २०१७/(३१/१७)/साशि-७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन
मुंबई ४०० ०३२
तारीख: ३० मार्च, २०१७

**वाचा**

१. भारत सरकार, युवा कार्य व क्रिडा विभाग यांचे क्र.D.O.No.G २००११/०२/२०१४-NSS, दिनांक १०.०५.२०१६ चे पत्र.
२. भारत सरकार, युवा कार्य व क्रिडा विभाग यांचे क्र.D.O.No.G ११०११/०१/२०१६-NSS, दिनांक ०१.०६.२०१६ चे पत्र.
३. भारत सरकार, युवा कार्य व क्रिडा विभाग यांचे क्र.D.O.No.G ११०११/०१/२०१६-NSS, दिनांक १६.०८.२०१६ चे पत्र.
४. भारत सरकार, युवा कार्य व क्रिडा विभाग यांचे क्र.D.O.No.G ११०११/०१/२०१६-NSS, दिनांक ०९.०९.२०१६ चे पत्र.
५. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शा.नि क्र. रासेयो २०१६/(१४२/१६)/ साशि-७, दि. २४.११.२०१६.
६. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शा.नि क्र. रासेयो २०१६/(११०/१६)/ साशि-७, दि. ०२.०७.२०१६.
७. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शा.नि क्र. रासेयो २०१७/(३१/१७)/ साशि-७, दि. १४.३.२०१७

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाने राष्ट्रीय सेवा योजना अंतर्गत नियमित आणि विशेष शिबीर कार्यक्रमांसाठी सन २०१६-१७ वर्षाकरीता प्रवर्गनिहाय अनुक्रमे नियमित कार्यक्रमांसाठी ३२७७०० व विशेष शिबीर कार्यक्रमासाठी १६३८५० इतकी विद्यार्थी संख्या महाराष्ट्र राज्यासाठी मंजूर केली आहे. सदर विद्यार्थी संख्या मागणी केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीनुसार निश्चित करुन प्रवर्गनिहाय सदर विद्यार्थी संख्येस प्रशासकीय विभागाची मान्यता घेण्यात आली असून सदर विद्यार्थी संख्येचे वाटप २०१६-१७ साठी अनुक्रमे वाचा क्र.६ मधील शासन निर्णयाद्वारे सर्व विद्यापीठांना करण्यांत आले आहे. विद्यापीठांना राष्ट्रीय सेवा योजनेचे उपक्रम राबविताना होणारा खर्च भागविण्यासाठी सन २०१० - ११ पासून सुधारित दराने नियमित कार्यक्रम रु. २५०/- आणि विशेष शिबीर कार्यक्रम रु. ४५०/- प्रति विद्यार्थी, प्रती वर्ष या दराने सहाय्यक अनुदानाचे वितरण करण्यात येते. भारत सरकार, युवा कार्य व क्रिडा विभाग यांचे अर्धशासकीय पत्र दिनांक १६.८.२०१६ व ९.९.२०१६ नुसार माहे एप्रिल,२०१६ पासून राष्ट्रीय सेवा

योजनेमध्ये केंद्र हिस्सा १०० टक्के झाला असून सदर योजना केंद्रशासित झाली आहे. त्यासाठी या कक्षाचे स्वतंत्र बँक खाते उघडले असून त्यात ई.सी.एस.द्वारे दिनांक २१.१२.२०१६ रोजी केंद्राकडून निधी प्राप्त झाला व वाचा क्र.७ नुसार सदर निधी २२ विद्यापीठांना राष्ट्रीय सेवा योजनेच्या कार्यक्रमांसाठी वितरित करण्यात आला होता. सद्यस्थितीत उर्वरित ३ विद्यापीठांना निधी वितरणाचा प्रस्ताव विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

भारत सरकार, युवा कार्य व क्रिडा विभाग यांचे अर्धशासकीय पत्र दिनांक १६.८.२०१६ व ९.९.२०१६ नुसार माहे एप्रिल,२०१६ पासून राष्ट्रीय सेवा योजनेमध्ये केंद्र हिस्सा १०० टक्के झाला असून सदर योजना केंद्रशासित झाली आहे. त्यासाठी या कक्षाचे आय.सी.आय.सी.आय.बँकेत स्वतंत्र बचत खाते उघडले असून त्यात ई.सी.एस.द्वारे केंद्राकडून निधी प्राप्त झाला आहे. केंद्र शासनाच्या उपरोक्त पत्रानुसार निधी राज्याकडे थेट न देता राष्ट्रीय सेवा योजनेच्या स्वतंत्र बचत खात्यात जमा करण्यात आला असल्याने संबंधित निधीबाबत अर्थसंकल्पात केलेली सन २०१६-१७ मधील सहाय्यक अनुदानाची तरतूद वापरता येत नाही. उच्च व तंत्र शिक्षण विभाग दिनांक १४.३.२०१७ च्या शासन निर्णयानुसार २२ विद्यापीठांना राष्ट्रीय सेवा योजनेच्या कार्यक्रमांसाठी निधी वितरित केला होता. उर्वरित ३ विद्यापीठांकडून उशिरा उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्यामुळे त्यांना उपरोक्त शासन निर्णयानुसार निधी वितरण केले नाही. सद्यस्थितीत उपरोक्त ३ विद्यापीठे / संचालनालयांकडून (मुंबई विद्यापीठ, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ व +२ शालेय शिक्षण संचालनालय, पुणे) सन२०१५-१६ चे लेखे उपयोगिता प्रमाणपत्रासह प्राप्त झाल्यामुळे त्यांना सन २०१५-१६ (अन्य वर्गासाठी समायोजित हप्ता) व सन २०१६-१७ (सर्व प्रवर्गासाठी प्रथम हप्ता समायोजनासह ८१ % ) केंद्र हिस्सा ,सहाय्यक अनुदानाचे (सशर्त) संबंधीत विद्यापीठांना वितरण करण्याबाबतचा निधी परिशिष्ट अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे राष्ट्रीय सेवा योजनेच्या आय.सी.आय.सी.आय.बँक बचत खात्यातून वितरणास सदर शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. उर्वरित ३ विद्यापीठे / संचालनालये (मुंबई विद्यापीठ, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ व +२ शालेय शिक्षण संचालनालय, पुणे) यांना सन २०१५-१६ (अन्य वर्ग ) चा समायोजित हप्ता व सन २०१६-१७ (सर्व प्रवर्ग) चा सहायक अनुदानाचा प्रथम हप्ता समायोजनासह ८१ % (केंद्र हिस्सा) म्हणून नियमित कार्यक्रमासाठी रक्कम रु.१,९४,४९,१२५/- व विशेष शिबीर कार्यक्रमासाठी) रु.१,६५,७८,२५६/- अशी एकूण रक्कम रु.३,६०,२७,३८१/- (अक्षरी रुपये तीन कोटी साठ लाख सत्तावीस हजार तिनशे एक्याऐंशी फक्त) सदर अनुदानाच्या रक्कमेस मासिक विवरणपत्राच्या अनुदानास अधीन राहून वितरणास मंजूरी देण्यात येत आहे. तसेच उपरोक्त विद्यापीठे / संचालनालये यांच्याकडे असलेली शिल्लक रक्कम सन २०१६-१७ मध्ये वापरण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.ज्या विद्यापीठांकडे सन २०१५-१६ चा निधी शिल्लक आहे त्यांना सदर निधी सन २०१६-१७ च्या देय रकमेतून समायोजीत करुन निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे (विद्यापीठांना देय रकमेचा तपशील सोबतच्या परिशिष्ट अ मध्ये दिलेला आहे. ( परिशिष्ट अ सोबत जोडले आहे).सहाय्यक अनुदानाची रक्कम ई.सी.एस. द्वारे संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव/ संचालक यांना राष्ट्रीय सेवा योजनेचे राज्य राष्ट्रीय सेवा योजना अधिकारी (राज्यसंपर्क अधिकारी/विशेष कार्य अधिकारी) हे अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांच्या मान्यतेने वितरीत करण्यात येत आहे. विद्यापीठांनी सदर अनुदान रकमेचे त्यांच्या अधिपत्याखालील

महाविद्यालयांना प्रवर्गनिहाय वाटप करुन सहायक अनुदान वाटप विवरण पत्र व उपयोगिता प्रमाणपत्र लेख्यासह सनदी लेखापालांच्या स्वाक्षरीने शासनास त्वरीत सादर करावे. तसेच विद्यापीठाने महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई आणि महालेखापाल, महाराष्ट्र - २ नागपूर तसेच या विभागाला अथवा त्याच्या प्रतिनिधीला राष्ट्रीय सेवा योजनेच्या अनुदानाचे सर्व लेखे तपासणी करिता सादर करावेत.

उपरोक्त रकमेला वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१९९ /व्यय-५, दिनांक १४/०२/२०१७ अन्वये मान्यता घेण्यात आली आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१७१२३६९८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Hansraj Salunkhe

Digitally signed by Atul Hansraj Salunkhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=STATE LIAISON OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b264114e5f2ab2d209a59196e3eb37b12d34901b451d626c61cd53a462c38f25, cn=Atul Hansraj Salunkhe
Date: 2017.03.30 17:21:15 +05'30'

**( डॉ. अतुल हं. साळुंके )**
राज्यसंपर्क अधिकारी/विशेष कार्य अधिकारी

**प्रत,**

१ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२ निवासी लेखा अधिकारी, मुंबई
३ महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र - १, मुंबई
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र - २, नागपूर
५. अवर सचिव, भारत सरकार, संस्कृती, युवा कार्य व क्रिडा मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली
६. सहाय्यक कार्यक्रम सल्लागार, राष्ट्रीय सेवा योजना विभागीय केंद्र, पुणे
७. सर्व संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव/ संचालक
८. सर्व संबंधित विद्यापीठाचे / संचालनालयाचे राष्ट्रीय सेवा योजना विभागाचे कार्यक्रम समन्वयक
९. वित्त विभाग (व्यय - ५), वित्त विभाग, (अर्थसंकल्प ८)
१०.उच्च व तंत्र शिक्षण विभाग, साशि - १/ लेखा शाखा /
११.निवड नस्ती साशि- ७

**परिशिष्ट अ**

**सन 2015-16 (अन्यसाठी समायोजित हप्ता) व 2016-17 (सर्व प्रवर्गासाठी प्रथम हप्ता समायोजनासह) सहाय्यक अनुदानाचा विद्यापीठांना देय हप्त्याच्या वितरणाबाबतचा तपशील**

| अ. क्र | विद्यापीठाचे नाव | विद्यार्थी | अन्यसाठी रक्कम रु. ( 2015-16 ) | | अनु.जाती रक्कम रु ( 2016-17 ) | अनु. जमातीची रक्कम रु (2016-17 ) | अन्यसाठीची रक्कम रु. ( समायोजीत करुन ) ( 2016-17 ) | अन्यसाठीची रक्कम रु. ( 2016-17 ) | एकूण देय रक्कम रुपये ( 15-16 व 16-17 ) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र हिस्सा ( देय रु ) | केंद्र हिस्सा शिल्लक रु समायोजना साठी | केंद्र हिस्सा | केंद्र हिस्सा | केंद्र हिस्सा | केंद्र हिस्सा ( 8-5 ) | केंद्र हिस्सा ( 6+7+9 ) |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 |
| 1 | मुंबई विद्यापीठ, मुंबई | R-41900 | 0 | 330642 | 788625 | 578437 | 7143901 | 6813259 | 8180321 |
| | | S-20950 | 0 | 566627 | 709762 | 520425 | 5986563 | 5419936 | 6650123 |
| | | एकूण देय | 0 | 897269 | 1498387 | 1098862 | 13130464 | 12233195 | 14830444 |
| 2 | शालेय शिक्षण संचालनालय (+ रस्तर) पुणे | R-34000 | 0 | 470696 | 623945 | 497017 | 5779038 | 5308342 | 6429304 |
| | | S-17000 | 0 | 68127 | 572644 | 454588 | 4863268 | 4795141 | 5822373 |
| | | एकूण देय | 0 | 538823 | 1196589 | 951605 | 10642306 | 10103483 | 12251677 |
| 3 | संत गाडगेबाबा महाराज अमरावती विद्यापीठ, | R-25400 | 0 | 307964 | 580687 | 445875 | 4120902 | 3812938 | 4839500 |
| | | S-12700 | 0 | 294790 | 522787 | 401287 | 3476476 | 3181686 | 4105760 |
| | | एकूण देय | 0 | 602754 | 1103474 | 847162 | 7597378 | 6994624 | 8945260 |
| | **एकूण सहाय्यक अनुदानाची रक्कम** | **Regular** | **0** | **1109302** | **1993257** | **1521329** | **17043841** | **15934539** | **19449125** |
| | | **Special** | **0** | **929544** | **1805193** | **1376300** | **14326307** | **13396763** | **16578256** |
| | | **एकूण देय** | **0** | **2038846** | **3798450** | **2897629** | **31370148** | **29331302** | **36027381** |

टिप - विद्यापीठांकडील वर्ष 2015-16 मधील नियमित तसेच विशेष शिबीर कार्यक्रमांतर्गत शिल्लक रक्कम वर्ष 2016-17 चे अनुदान म्हणून ग्राह्य धरुन खर्च करण्यास अनुमती देण्यात येत आहे. त्यामुळे सदर विद्यापीठांना वर्ष 2015-16 ची शिल्लक वर्ष 2016-17 मधुन समायोजित करण्यात येत आहे.